सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात जिल्हा वार्षिक योजनेतंर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून यंत्रसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया

महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

शासन निर्णय, क्रमांक : जीसीजी-२०२१ /प्र.क्र.३५६/प्रशा-१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय

९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१

दिनांक : ०३ जानेवारी, २०२२

वाचा :
1. शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/ भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
2. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४० / आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
3. शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१४/प्र.क्र. २१५/ उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७
4. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०२१/प्र.क्र.८/उद्योग-४, दिनांक ०७.०५.२०२१
5. जिल्हाधिकारी तथा जिल्हा नियोजन समिती,गोंदिया यांचे पत्र क्र.जिनिस/गों/का-२/६२७/२०२१-२२, दिनांक ०७.०६.२०२१
6. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक संवैशिवसं/ यंसाख/शावैम,गोंदिया/जिवायो/२०२१-२२/१३६२१/म/२०२१,दिनांक १२.१०.२०२१

शासन निर्णय :

उपरोक्त नमूद दिनांक १२.१०.२०२१ च्या पत्रान्वये संचालनालयाने शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया या संस्थेस सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून रुपये ३,११,९५,८३०/- (रुपये तीन कोटी, अकरा लक्ष, पंच्याण्णव हजार, आठशे तीस फक्त) इतक्या किंमतीची खालील तक्त्यात नमूद यंत्रसामुग्री खरेदी करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्रसामुग्रीचे नांव | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | एक्स रे मशिन-३०० एमए/५०० एमए | १ | २०००००० | २०००००० |
| २ | सोनोग्राफी मशीन विथ कलर डॉप्लर | १ | ७७८४००० | ७७८४००० |
| ३ | रिजीड ब्रॉन्कोस्कॉपी युनिट | १ | ४०००००० | ४०००००० |

| अ.क्र. | यंत्रसामुग्रीचे नांव | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| ४ | अल्ट्रासाऊंड २ डी कलर डॉपलर मशीन | १ | २३५०००० | २३५०००० |
| ५ | रिअल टाईम पीसीआर मशीन | १ | १२२६०२० | १२२६०२० |
| ६ | ट्रुनॅट मशीन | १ | १६५०००० | १६५०००० |
| ७ | क्रायो सेन्ट्रीफ्युज (ब्लड बँक) | १ | १६९८६१० | १६९८६१० |
| ८ | ऑपरेटीव्ह मिनी हिस्ट्रोस्कोपी सेट | | २०८३२०० | २०८३२०० |
| ९ | ह्युमन ब्रेस्ट मिल्क बँक युनिट | १ | ३२९८००० | ३२९८००० |
| १० | हाय फ्रिक्वेन्सी पेडियाट्रिक ॲन्ड न्युआनेटल व्हेन्टीलेटर | २ | २५५३००० | ५१०६००० |
| एकूण | | | | ३११९५८३० |

अटी :-

१. सदर यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीची प्रशासकीय मान्यता संस्थेस जिल्हा वार्षिक योजनातंर्गत मंजूर अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४ / प्र.क्र.८२ / भाग-III / उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया “औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत” निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

४. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची, विद्युतीकरणाची तसेच नवीन पदनिर्मीतीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात आलेली आहे.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक / पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्तांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे.

११. समान स्वरुपाची व समान विनिर्दिष्टे असलेल्या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची एकच निविदा प्रसिध्द करणेबाबतची कार्यवाही हाफकीन महामंडळाने करावी. अशा प्रकारे निविदा प्रसिध्द करणे हाफकीन महामंडळास शक्य होईल यानुषंगाने आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांनी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीची मागणी नोंदवावी.

१२. संस्थास्तरावर खरेदी करण्यात येणाऱ्या यंत्रसामुग्रीची खरेदी शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ च्या खरेदी धोरणातील कार्यपध्दतीनुसार करतांना याबाबत सदर खरेदी शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण २०१४ / प्र.क्र. २१५ / उद्योग -४, दिनांक २४.०८.२०१७ अन्वये विहीत करण्यात आलेल्या गव्हर्नमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टल कार्यपध्दतीचा वापर करावा.

२. प्रस्तुत विषयी उपरोक्त यंत्रसामुग्रीसाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

नियोजन विभाग मागणी क्रमांक-ओ-७३

४५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम यावरील भांडवली खर्च
८०० इतर खर्च
(६०) जिल्हा योजना - गोंदिया
(६०) (०१) इतर जिल्हा योजना (कार्यक्रम) (४५१५ ०८०७)
५२ यंत्रसामुग्री

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग - २, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०३१८५६०५९८१३ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
Date: 2022.01.03 20:06:39 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

( सुधीर शेट्टी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
२. महालेखाकार -२ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, नागपूर
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स् कॉर्पोरेशन लि., मुंबई.
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोंदिया
६. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया
७. निवडनस्ती (प्रशा-१)